**भंडारदरा प्रकल्पांतर्गत प्रवरा खो-यातील आढळा मध्यम प्रकल्पाचे आढळा उजवा कालवा वितरीका क्र.१ व वितरीका क्र.१ वरील चारी क्र.१ ,२,३,४ च्या पुर्नस्थापना व नुतनीकरण कामास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सिडीए प्रमा-२०१९/(प्र.क्र.२५/१९) /लाक्षेवि (कामे)**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : २० सप्टेंबर, २०२१

<u>वाचा:</u> १) शासन निर्णय - २०१७/(५६६/१७)/सिंव्य (कामे), दि. ३१/०८/२०१८
२) शासन निर्णय - संकीर्ण -२०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि. २६/०५./२०१७
३) शासन निर्णय संकीर्ण - २०१८/(प्र.क्र. ५५१/१७) सिंव्य (कामे), दि. २७/११/२०१८.
४) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र जा. क्र. गोमपाविमं/सिंचन-१/धा-२०१/२०४६ दिनांक १०.०३.२०२१.

<u>प्रस्तावना:-</u>

महाराष्ट्र सिंचन अधिनियम २००५ नुसार सिंचन पध्दतीचे शेतक-याकडून व्यवस्थापन लागू (MMISF) करण्यासंबधी दाखल झालेल्या जनहित याचिका क्रं १७३/२०१३ वरील मा.उच्च न्यायालयाने दिनांक २३/०९/२०१६ चे दिलेल्या निर्देशानुसार उर्ध्व गोदावरी प्रकल्पापासून माजलगांव प्रकल्पापर्यंत प्रकल्पाच्या लाभक्षेत्राची निश्चिती करून प्रकल्पाचे लागवडीलायक (C.C.A.) क्षेत्रावर पाणी वापर संस्था स्थापन करणे बंधनकारक आहे.

आढळा मध्यम प्रकल्प प्रवरा नदीवर बांधण्यात आला असुन प्रवरा नदीचे खोरे हे गोदावरी नदीचे उपखोरे आहे. प्रस्तावित काम प्रवरा खो-यातील आढळा मध्यम प्रकल्पाच्या आढळा उजवा कालव्यावरील वितरीका क्र.१ व वितरीका क्र.१ वरील चारी क्र.१ ,२,३,४ च्या विशेष दुरुस्तीचे आहे. सदर प्रकल्पावरील वितरण व्यवस्थेचे बांधकाम सुमारे ४०-४२ वर्ष जुने असुन आता त्याची दुरावस्था झाली आहे. सबब वितरण व्यवस्था पुर्नस्थापना व नुतनीकरणाची कामे हाती घेण्याचे नियोजन आहे. यात वितरण व्यवस्थेवरील विमोचके, फॉल्स, प्रवाहमापन यंत्रे, गावरस्ता पुल या बांधकामाची दुरूस्ती तसेच पोहोच रस्ते व पाणी वापर संस्था स्तरीय कामे समाविष्ट आहे. सदर विशेष दुरूस्तीचे कामांना प्रशासकिय मान्यता देण्याचे शासनाचे विचाराधिन होते. याबाबत शासन आता पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत आढळा उजवा कालवा वितरीका क्र.१ व वितरीका क्र.१ वरील चारी क्र.१ ,२,३,४ च्या पुर्नस्थापना व नुतनीकरण करिता विशेष दुरूस्ती अंतर्गत अंदाजित किंमतीच्या (कामाप्रित्यर्थ रुपये ४,२०,४९,७०७/- (रु. चार कोटी वीस लक्ष एकोणपन्नास हजार सातशे सात फक्त) व इतर अनुंषगिक खर्च रू. ६७,४०,५६८/- (रु. सदुसष्ट लक्ष चाळीस हजार पाचशे अडूसष्ट फक्त) एकुण रुपये ४,८७,९०,२७५/- (रु. चार कोटी सत्याऐंशी लक्ष नव्वद हजार दोनश पंचाहत्तर फक्त) प्रस्तावास खालील अटींच्या आधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र प्रमा २०१३/(७८५/१३)/सिंव्य ( कामे) दि ०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सुचनांचे पालन करणे, अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बांधनकारक आहे.

२. तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण संकल्पनावर आधारित तरतूद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

३. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी .

४. सदर प्रशासकिय मान्यता संबंधित निविदा विषयक कार्यवाही हाती घेण्यापुर्वी MMISF Act २००५ नुसार लाभक्षेत्र हस्तांतरणा करिता आवश्यक संयुक्त पाहणीतील प्राधान्य-१ ची कामे यात समाविष्ट असल्याबाबत नियमानुसार कार्यवाही पुर्ण करण्यात यावी.

५. प्रस्तावित वितरण प्रणालीच्या विशेष दुरूस्तीचे कामे पूर्ण झाल्यानंतर संपूर्ण लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस विहित कालमर्यादेत हस्तांतरण करण्याची जबाबदारी पुर्णपणे अधीक्षक अभियंता यांची राहील.

६. मातीकामे व गवत झाडे / झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रीकी विभागाकडील उपलब्ध मशिनरीने करावीत.

७. प्रस्तावीत कामांमुळे खोदकाम / तोडफोड उपलब्ध् होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी .

८. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातुन प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजीत वेळेत पूर्ण करण्यात यावा.

९. सदर प्रशासकिय मान्यता अंदाजपत्रकातील कामासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजुर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादे बाहेर जाऊन निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलीत शासन निर्णय , CWC ची मार्गदर्शक तत्वे , वित्तीय अधिकार मर्यादा, विहीत केलेली निवीदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (१२) उर्वरीत महाराष्ट्र (१२) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १९४) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर प्रशासकिय मान्यता शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि. २६.०५.२०१७ व्दारे आं. वि. स व उ. स. यांच्या सहमतीने जलसंपदा विभागास विशेष दुरुस्तीच्या प्रशासकिय मान्यताचे अधिकारानुसार प्रदान करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता लाक्षेवि (कामे) कार्यासनाच्या नोंदवही क्र. ३ सन २०२१-२२ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९२०१७४००८७७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Purnima Devang Desai

Digitally signed by Purnima Devang Desai
DN: CN = Purnima Devang Desai, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2021.09.20 17:41:42 +05'30'

**सोबत: परिशिष्ट - अ**

**( पूर्णिमा देसाई )**
शासनाचे उप सचिव

**प्रत:-**

१. मा.राज्यपालाचे सचिव, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.
३. मा.अध्यक्ष / उपाध्यक्ष , विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा.सभापती / उपसभापती , विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा.विरोधी पक्ष नेते, विधानसभा, मुंबई या कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा.विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद मुंबई या कार्यालय, विधानभवन, मुंबई.

७. मा. मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, (जलसंपदा ) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. महालेखापल - २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१४. मुख्य अभियंता, (जसं) जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक
१५. आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाक्षेविप्रा, नाशिक
१७. कार्यकारी अभियंता, अहमदनगर पाटबंधरे विभाग, अहमदनगर
१८. लाक्षेवि (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

परिशिष्ट - अ

आढळा प्रकल्पाच्या उजव्या कालव्यावरील वितरीका क्र.१ व वितरीका क्र.१ वरील

चारी क्र.१,२,३,४ च्या विशेष दुरूस्ती प्रस्तावास प्रशासकिय मान्यता

शासन निर्णय क्रमांक: प्रमा-२०१९/ (प्र.क्र. २५ /१९)/ लाक्षेवि (कामे)
दिनांक : २०/०९/२०२१ चे सहपत्र

Administrative Approval to Special Repair of Adhla Right bank canal renovation of Distributory No.1 and Its minor No. 1 to 4

ABSTRACT

| SR.NO. | NAME OF SUB ESTIMATE | Amount in Rs. |
|---|---|---|
| D | Regulator | 5892700.00 |
| E | Falls | 17456662.00 |
| F | R.H.T. Works | 557401.00 |
| G | Bridges | 3874050.00 |
| L | Earth work & lining | 6921139.00 |
| O | Miscellaneous | 1212538.00 |
| R | Communication | 6135217.00 |
| | Total Rs. | 42049707.00 |
| | Add 1% for Cess of Insurance | 420497.07 |
| | Add 3% for Contingencies | 1274106.00 |
| | Add 12% for GST on Work Portion | 5045964.84 |
| | Total Rs. | 48790274.91 |
| | Say | **48790275.00** |

Purnima Devang Desai

Digitally signed by Purnima Devang Desai
DN: CN = Purnima Devang Desai, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2021.09.20 17:42:00 +05'30'

( **पूर्णिमा देसाई** )
शासनाचे उप सचिव